**अपंग व्यक्तींना स्वयंरोजगारासाठी राबविण्यात येणाऱ्या बीज भांडवल योजने अंतर्गत उत्पन्न मर्यादा व प्रकल्प मर्यादा वाढविणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,
शासन निर्णय क्रमांक :- अपंग- २००८/ प्र.क्र. २१२/ सुधार -३
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- **२ जुलै, २०१०.**

**वाचा:- १) शासन** निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग,
क्रमांक :- इडीडी- १०८७/ २८८६३/(१५८)/ सुधार -२, दि.५.१. १९८९
**२) शासन** निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रीडा व पर्यटन विभाग,
**क्रमांक** :- इडीडी- १०८७/ २८८६३/(१५८)/ सुधार -२, दि.१९.१. १९८९
**३) शासन** निर्णय, समाजकल्याण, सांस्कृतिक कार्य, **क्रीडा** व पर्यटन विभाग,
**क्रमांक** :- इडीडी- १०८७/ २८८६३/(१५८)/ सुधार -२, दि. ८.११. १९८९

**प्रस्तावना:- संदर्भाधीन** शासन निर्णयान्वये राज्यामध्ये अपंग व्यक्तींना **स्वयंरोजगारासाठी बीज भांडवल योजना सुरु करण्यात आलेली आहे. सदर योजनेखाली** लाभार्थ्यांची वार्षिक उत्पन्न मर्यादा रु.६०००/- **ठरविण्यात आलेली आहे. तसेच प्रकल्प खर्च मर्यादा रु.२५,०००/-** एवढी निश्चित करण्यात आलेली आहे. सदरची उत्पन्न मर्यादा व **प्रकल्पाची** खर्च मर्यादा **त्याचप्रमाणे अनुदान मर्यादा** सदयस्थितीत फारच कमी असल्याने ती वाढविण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-** "अपंग व्यक्तींना स्वयंरोजगारासाठी बीज भांडवल उपलब्ध करुन देणे " **या योजने अंतर्गत लाभार्थ्यांची वार्षिक** उत्पन्न मर्यादा रु.६,०००/- वरुन रु.१,००,०००/- एवढी करण्यात येत आहे. तसेच **प्रकल्प खर्चाची मर्यादा रु.२५,०००/- वरुन रु.१,५०,०००/-** एवढी करण्यास व प्रकल्प **खर्चाच्या** जास्तीत जास्त २०% **एवढी रक्कम** अनुदान व **उर्वरित रक्कम (८०%) बँकेकडून** कर्जरूपात देण्यास शासन मान्यता देत आहे.

२. मात्र, सदर योजनेच्या इतर अटी व शर्ती हया उपरोक्त वाचा मधील क्र.१ व २ **मधील शासन निर्णयामध्ये नमूद केल्यानुसार कायम** राहतील.

३. यावर होणारा खर्च हा खर्च मागणी क्र.एन-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व **कल्याण- ०२ समाजकल्याण, १०१, अपंग कल्याण (०८)** अशासकीय संस्थांना सहाय्य (०८) (१०) लघु उदयोगासाठी **शारीरिकदृष्टया** अपंग व्यक्तींना **वित्तीय सहाय्य (२२३५ २७७ १ )** ३१ सहाय्यक अनुदान **आणि मागणी क्र.एन-३, २२३५, सामाजिक सुरक्षा व कल्याण- ०२ समाजकल्याण, १०१,** अपंग कल्याण (०५) शारीरिकदृष्टया अपंग व्यक्तींसाठी **इतर योजना (०५) (०१) शारीरिकदृष्टया अपंगांना शिष्यवृत्त्या व उदयोगातील** प्रशिक्षण (२२३५ ०९१ ९ ) ३४ शिष्यवृत्त्या /विदयावेतन **या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.**

४. **सदर शासन** निर्णय वित्त विभाग व नियोजन विभागाच्या संमतीने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. **६०/व्यय-१४ /१०, दि.** ११.२.२०१० अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

( कृ. मा. प.)

रोटा/एच-१३६०[ १०००-७-२०१-२

५. हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००७०२१५०४२०००१** आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( ज. न. राठोड )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति :-
मा. राज्यपाल यांचे सचिव,राजभवन, मलबार हिल, मुंबई,
मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्री / राज्यमंत्री, यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
मा. मुख्य सचिव यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
सर्व मंत्रालयीन विभागांचे अमुस /प्र.स./सचिव,
आयुक्त, अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
संचालक, समाज कल्याण महाराष्ट्र राज्य, पुणे,
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य अपंग वित्त व विकास महामंडळ, मुंबई
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्गीय वित्त आणि विकास महामंडळ, मुंबई
उदयोग आयुक्त, महाराष्ट्र राज्य, पुणे,
सर्व जिल्हाधिकारी,
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद,
सर्व विभागीय समाजकल्याण अधिकारी,
सर्व जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
सर्व विशेष जिल्हा समाज कल्याण अधिकारी,
महालेखापाल, महाराष्ट्र -१ /२ (लेखा लेखापरिक्षा), मुंबई /नागपूर
महालेखापाल, महाराष्ट्र -१/२ (लेखा व अनुज्ञेयता / लेखापरिक्षा), मुंबई/नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
सर्व जिल्हा कोषाधिकारी ,
उदयोग,ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय, मुंबई,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
वित्त विभाग ( का. व्यय-१४/१०), मंत्रालय, मुंबई
अवर सचिव, कार्यासन अर्थसंकल्प, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई,
महासंचालक, माहिती व जनसंपर्क, मंत्रालय, मुंबई (५ प्रती प्रसिध्दीसाठी)
सर्व मान्यताप्राप्त राजकीय पक्ष (प्रत्येकी ५ प्रती)
विधानमंडळ ग्रंथालय, विधान भवन, मुंबई (१० प्रती)
सर्व कार्यासने ,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग,मंत्रालय, मुंबई,
निवड नस्ती, का- सुधार -३